**सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या कार्यालयातील दूरध्वनी नियंत्रित करणारी EPABX (इलेक्ट्रॉनिक प्रायव्हेट ऑटोमॅटिक ब्रँच एक्सचेंज) यंत्रणा खरेदीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-८२२५/प्र.क्र.१४२ (ई-१०४०४३८)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२५

**वाचा :-**

१. उद्यग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र. ८/ भसग-III/ उद्योग-४, दि. ०१ डिसेंबर, २०१६.
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं. / आस्था-५५/११८३, दिनांक ०५ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

उपनिर्दिष्ट २ अन्वये, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयात दूरध्वनींना नियंत्रित करणारी EPABX (इलेक्ट्रॉनिक प्रायव्हेट ऑटोमॅटिक ब्रँच एक्सचेंज) यंत्रणा संदर्भ क्र. १ मध्ये नमूद शासन निर्णयातील अटींच्या अधिन राहून खरेदी करण्यात आली आहे. सदर यंत्रणा खरेदी करण्यास्तव संचालनालयामार्फत करण्यात आलेल्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई येथे दूरध्वनींना नियंत्रित करणारी EPABX (इलेक्ट्रॉनिक प्रायव्हेट ऑटोमॅटिक ब्रँच एक्सचेंज) यंत्रणा खरेदी करण्यासाठी करण्यात आलेला खर्च रुपये २,१०,४४१/- (रुपये दोन लक्ष दहा हजार चारशे एक्केचाळीस फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती-, ०१ ललित कला शिक्षण १०१ सांस्कृतिक कार्य संचालनालय (०१) (०२) सांस्कृतिक कार्य संचालनालय (२२०५ १३७४) - १३ कार्यालयीन खर्च, या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात येईल.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०४.** सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. १४, नियम ६२ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२०१८४३३९८८२३ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.20 18:45:09 +05'30'

**( बाळासाहेब ई. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४